**जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत जिल्हा योजनांना निधी ठेवण्याबाबत तसेच जिल्हा योजना अंतर्गत कामांकरीता ई-निविदा टाळण्यासाठी कामांचे तुकडे न पाडण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नियोजन विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः डिएपी-१०१६/प्र.क्र.४७/का.१४८१

मंत्रालय, मुंबई.- ४०० ०३२

तारीख: १८एप्रिल, २०१७

**वाचा-**

१. शासन परिपत्रक, नियोजन विभाग, क्र. डिएपी-१०१६/प्र.क्र.१७४/का.१४८१,दि. २५ जुलै,२०१६.

२. शासन पत्र, नियोजन विभाग, क्र. डिएपी- १०१६/ प्र.क्र. २९३/का.१४८१, दि. १ डिसेंबर,२०१६.

३. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. संकिर्ण- २०१५/ प्र.क्र. ७०/इमा-२,दि. ६ मे, २०१५.

४. शासन परिपत्रक, नियोजन विभाग, क्र.डिएपी-१०१६/प्र.क्र. ४७/का.१४८१,दि.१९ मार्च, २०१६

## परिपत्रक

संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रान्वये जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत सन २०१७-१८ अंतर्गत राबवावयाच्या १३७ जिल्हा योजनांची यादी निर्गमित करण्यात आली आहे. या जिल्हा योजनांच्या अनुषंगाने तसेच शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग (माहिती व तंत्रज्ञान संचालनालय) क्र. मातंस/ नस्ती-२०१२/ प्र.क्र.२७३/ ३९, दि.२६नोव्हेंबर,२०१४ अन्वये **रु. ३ लाखापेक्षा** अधिक खर्चाच्या बांधकामाची/ रस्त्याची कामे, साधनसामुग्रीची खरेदी इत्यादी कामांकरिता ई-निविदा कार्यप्रणालीचा अवलंब करणे आवश्यक असताना देखील ई-निविदा कार्यप्रणाली टाळण्यासाठी जिल्हा वार्षिक योजना अंतर्गत हाती घेण्यात येणा-या कामांचे तुकडे पाडण्यात येत असल्याची शक्यता विचारात घेता या संदर्भात सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. वरील पार्श्वभूमीवर जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत राबविण्यात येत असलेल्या जिल्हा स्तरीय योजना व त्या अंतर्गत घेण्यात येणारी कामे याबाबत खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत असून या सूचनांचे काटेकोर पालन करण्यात यावे असे शासनाचे आदेश आहेत.

(१) संदर्भाधीन क्र.१ व ४ येथील परिपत्रकांन्वये जिल्हास्तरीय योजनांच्या यादीतील ज्या जिल्हास्तरीय योजनांच्या प्रशासकीय मान्यतेचे/ अंमलबजावणीबाबत मार्गदर्शक सूचनांचे धोरणात्मक शासन निर्णय योजनेच्या संबंधित प्रशासकीय विभागाने अद्याप निर्गमित केलेले नाहीत अशा योजनांसाठी जिल्हा वार्षिक योजनांच्या आराखड्यात नियतव्यय ठेवण्यात येऊ नये व जिल्हा नियोजन समितीने नियतव्यय ठेवला असला तरी त्या योजनेस किंवा योजनेतील कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात येऊ नये व निधी वितरीत करण्यात येऊ नये, अशा सूचना देण्यात आल्या आहेत. या सूचनेचे त्याप्रमाणेच शासन परिपत्रकातील इतर सूचनांचे काटेकोरपणे पालन करुन कार्यवाही करण्यात यावी.

(२) जिल्हा वार्षिक योजने अंतर्गत रस्त्यांची कामे हाती घेताना पूर्ण रस्त्याचे काम हाती घ्यावे व सदर काम तुकडे पाडून करु नये अशा सूचना शासन पत्र, नियोजन विभाग, डिएपी- १०१०/ सं.क्र. ५९/ का. १४८१, दि. ११ मार्च,२०१० अन्वये यापूर्वी देण्यात आल्या आहेत. आता संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयाच्या अनुषंगाने ई-निविदा कार्यप्रणाली टाळण्यासाठी जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत जिल्हा योजना अंतर्गत हाती घेण्यात येणा-या विकासात्मक कामे, सेवा, वस्तुंची खरेदी इत्यादी कामांचे तुकडे पाडण्यात येऊ नये अशा सूचना देण्यात येत आहेत. सदर सूचना जिल्हा योजनांशी संबंधित सर्व कार्यान्वयीन यंत्रणांच्या निदर्शनास आणून त्यानुसार त्यांच्याकडून कार्यवाही होईल याची खातरजमा जिल्हाधिका-यांनी करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१८१२०७२७०८१६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Netra Prashant Mankame

Digitally signed by Netra Prashant Mankame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19e4a6ac471ded0614da7ea31c20099ea471d8436dcf49faa3c0b2e0638732c3, cn=Netra Prashant Mankame
Date: 2017.04.19 16:45:02 +05'30'

**(ने.प्र.मानकामे)**
अवर सचिव, नियोजन विभाग.

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री यांचे सचिवालय, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
६. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. सर्व विभागीय आयुक्त,
८. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव (सर्व), जिल्हा नियोजन समिती (सर्व जिल्हे)
९. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१०. सर्व सह/ उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. सर्व उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालये.
१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३. जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व), जिल्हा नियोजन समिती (सर्व जिल्हे)
१४. कक्ष अधिकारी, का. १४८१-अ, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५. निवड नस्ती, का. १४८१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.